**मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्या अधिनस्त कार्यालयातील प्रतिनियुक्तीचा कालावधी संपुष्टात आण्ण्याबाबत.**
**श्री.स.धो.तपसे, सहायक कक्ष अधिकारी**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि-१५१८/प्र.क्र.६७/१४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १६ ऑक्टोबर, २०२०

वाचा : १) समक्रमांकासचे दिनांक १३-०६-२०१८ चे शासन आदेश.
२) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांनी त्यांच्या क्र.मौआम/प्रशासन/२०२०/७०८, दिनांक ३०-०६-२०२० चे पत्र

**शासन आदेश**

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक १३-०६-२०१८ च्या आदेशान्वये श्री. स.धो.तपसे, सहायक कक्ष अधिकारी, मसहूल व वन विभाग, यांच्या सेवा २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा कार्यालय, लातूर या कार्यालयात जिल्हा व्यवस्थापक या पदावर उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. सदरहू पदावर श्री. तपसे हे ०१-०७-२०१८ पासून कार्यरत असून त्यांचा प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी दिनांक ३०-०६-२०२० रोजी संपुष्टात आलेला आहे.

२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही २०११/प्र.क्र.१३७/का.१२, दिनांक १७.१२.२०१६ अन्वये प्रतिनियुक्तीचे धोरण निश्चित करण्यात आले असून, या शासन निर्णयास शा.नि. क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दिनांक १६-०२-२०१८ अन्वये दि.१७-१२-२०१६ च्या शासन निर्णयातील परि.५ मध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

परि.क्र. ५ (अ) (३) :- प्रतिनियुक्ती प्रथमत: ३ वर्षासाठी देण्यात यावी व संबंधित अधिकाऱ्याची इच्छुकता व संवर्ग नियंत्रण विभागाचे सहमतीने हा कालावधी चौथ्या वर्षाकरिता वाढविण्यात यावा.

३. श्री. स.धो.तपसे, सहायक कक्ष अधिकारी, यांचे संवर्ग नियंत्रण या विभागाकडे असल्यामुळे व व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांनी संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक ३०-०६-२०२० च्या पत्रात श्री. तपसे यांच्या प्रतिनियुक्तीस २ वर्ष मुदतवाढ देण्याबाबत नमूद केलेले प्रशासकीय कारण तसेच श्री. तपसे, यांनी दिनांक ०९-०६-२०२० च्या निवदेनान्वये कौटुंबिक कारणास्तव त्यांच्या प्रतिनियुक्तीस मुदतवाढ देण्याबाबत विनंती केली आहे.

४. वित्त विभागाच्या दिनांक ०४-०५-२०२० च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग वगळता कोणत्याही विभागाने कोणत्याही प्रकारची नवीन पदभरती करु नये असे निर्बंध घालण्यात आलेले आहेत. मंत्रालयात मोठया प्रमाणात सहायक कक्ष अधिकारी संवर्गात पदे रिक्त आहेत. यास्तव प्रतिनियुक्तीवर असलेल्या कर्मचाऱ्यांच्या सेवा प्रत्यावर्तीत करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे.

५. वर परि. ४ मधील वस्तुस्थिती विचारात घेता श्री. स.धो.तपसे, सहायक कक्ष अधिकारी यांचा मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा कार्यालय, लातूर या कार्यालयातील, जिल्हा व्यवस्थापक या पदावरील प्रतिनियुक्तीचा कालावधी

संपुष्टात आणून त्यांच्या सेवा प्रत्यावर्तीत करण्यात येऊन त्यांची प्रत्यावर्तनानंतरची पदस्थापना संवर्ग नियंत्रण विभाग (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४-अ) कडे करण्यात येत आहे.

६. श्री.स.धो.तपसे, सहायक कक्ष अधिकारी, यांना मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्या अधिनस्त जिल्हा कार्यालय, लातूर या कार्यालयातून दिनांक २०-१०-२०२० (म.नं.) पासून एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. श्री. तपसे यांनी प्रत्यावर्तनानंतर पुढील पदस्थापना मिळण्यासाठी संवर्ग नियंत्रण विभाग (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४-अ) कडे तात्काळ रुजू व्हावे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१६१५१९०८३६०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VRISHALI VINOD BHINGARDE

Digitally signed by VRISHALI VINOD BHINGARDE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administrative Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0863fc5c9cdcc85881943ea0d1a5438c42d27c0b1580feba5579800452b60209, serialNumber=6b870a94454e2b13ee0959c3370d5d53d60a17d4b6d3ed6077e40a0f53e7a053, cn=VRISHALI VINOD BHINGARDE
Date: 2020.10.16 15:21:01 +05'30'

**( वृषाली वि. भिंगार्डे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित कर्मचारी (व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांच्यार्फत)

**प्रत,**

१. अ.मु.स./प्र.स./सचिव महसूल व वन विभाग/ अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२. सह/उप सचिव (आस्थापना), महसूल व वन विभाग/अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई २रा मजला, डी.डी.इमारत, जुने जकात घर, शहीद भगतसिंग मार्ग, मुंबई-४०००२१.
४ उप सचिव (का-८), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, सदर कर्मचाऱ्याच्या सेवा समाप्त करण्यात आल्यामुळे त्यांनी संवर्ग नियंत्रण विभाग (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १४-अ) कडे तात्काळ रुजू व्हावे
५ साप्रवि/१४-अ (संग्रहार्थ).